**श्री. प्रविण पिसे, वरिष्ठ लिपिक, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अकोला यांचे नाव अधिसंख्य पदावर घेण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या यादीतून वगळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १३ सप्टेंबर, २०२१.

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१/१२/२०१९.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.४/१/२०२०.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक, क्रमांक-न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.१५/०१/२०२० व दि.३१/१/२०२०.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्रमांक-न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.२९/६/२०२०.
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयाचे पत्र क्र.संकीर्ण-२०१९/आस्था-ब (१२३)/१२०६, दि.४/३/२०२०.
६) अति.सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवीन महाराष्ट्र सदन, नविन महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १२/२०२१, दि.५/१/२०२१

**प्रस्तावना -**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकामध्ये दि. ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबतची कार्यवाही संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या गट-क मधील ११ व गट-ड मधील ३ अशी एकूण १४ अधिसंख्य पदे संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यास संदर्भ क्र.०२ येथे नमूद शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

श्री. प्रविण पिसे, वरिष्ठ लिपिक, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अकोला यांच्या सेवा, शासन निर्णय, दि.०४/०१/२०२० अन्वये अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आले आहे. श्री. पिसे यांचे ठाकूर या जातीचे प्रमाणपत्र, जात वैधता समितीने अवैध ठरविल्यामुळे त्यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे अनुक्रमे याचिका क्र.२५९५/२००४ दाखल केले आहे. सदर याचिकेच्या सुनावणीअंती मा. उच्च न्यायालयाने अंतरिम आदेश पारित केले आहेत. सदर निर्णयाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात श्री. पिसे यांनी एसएलपी क्र.२६३६१/२०१८ दाखल केलेली आहे. सदरहू प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दिलेली Interim order मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.२६/०९/२०१८ चे आदेशान्वये कायम केलेली आहे. तसेच सद्य:स्थितीत प्रकरण मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असल्याने त्यांचे नाव शासन निर्णयातील

विवरणपत्रातून वगळण्याबाबत संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये या विभागास विनंती केली आहे. सदर विनंतीस अनुसरुन विधि व न्याय विभाग, मंत्रालय व विधि व न्याय विभाग, नागपूर यांच्या सुचनेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या सरकारी वकीलांचे अभिप्राय विचारात घेऊन श्री. पिसे यांचे नाव संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयातील अधिसंख्य पदावरुन वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

श्री. प्रविण पिसे, वरिष्ठ लिपिक, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अकोला यांचे नाव संदर्भ क्र.२ येथील दि.४/१/२०२० रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रातून वगळण्यास मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल एसएलपी (सिव्हील) क्र. २६३६१/२०१८ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा सांकेतांक २०२१०९१४१२१८२८२६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2021.09.14 12:21:36 +05'30'

**( सं. ब. ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य
२) मा. मुख्यमंत्री/मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
३) मा. मंत्री/मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
४) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
५) महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
६) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
११) जिल्हा कोषागार कार्यालय, अकोला
१२) निवडनस्ती (प्रशा-५)